**केंद्र पुरस्कृत समग्र शिक्षा (प्राथमिक शिक्षण, माध्यमिक शिक्षण व शिक्षक शिक्षण) कार्यक्रमासाठी चौथ्या हप्त्याचा (सर्वसाधारण हिस्सा) निधी वितरीत करणेबाबत. (केंद्र हिस्सा व राज्य हिस्सा).**

**महाराष्ट्र शासन**
**शालेय शिक्षण व क्रीडा विभाग**
**शासन निर्णय क्रमांक:- समग्र २०२३/प्र.क्र.२६१/ एसडी-१**
मंत्रालय विस्तार भवन, मुंबई ४०००३२
दिनांक :- २६ मार्च, २०२४.

**संदर्भ :-**

१) राज्य प्रकल्प संचालक, महाराष्ट्र प्राथमिक शिक्षण परिषद, मुंबई यांचे दि.२२.०३.२०२४ रोजीचे पत्र.
२) केंद्र शासन, शिक्षण मंत्रालय, नवी दिल्ली यांचे आदेश क्र. F.No-७-२/२०२३-IS-१(GEN), दि.२२.०३.२०२४.
३) शासन निर्णय समक्रमांक, दि. १६.११.२०२३, दि. २१.११.२०२३, दि.२९.०१.२०२४ व दि.०६.०३.२०२४
४) वित्त विभागाचे क्र. अर्थसं-२०२३/प्र.क्र.४०/अर्थ-३, दि. १२.०४.२०२३ , दि. ०८.१२.२०२३ व दि.०४.०३.२०२४ चे परिपत्रक

**प्रस्तावना :-**

राज्य प्रकल्प संचालक, महाराष्ट्र प्राथमिक शिक्षण परिषद, मुंबई यांनी त्यांच्या उक्त संदर्भ क्र. १ येथील पत्रान्वये समग्र शिक्षा योजनेच्या अंमलबजावणीसाठी केंद्र हिस्स्याचा चौथ्या हप्ता व त्यास समरूप राज्य हिस्सा निधी वितरीत करण्याचा प्रस्ताव शासनास सादर केला आहे.

२. समग्र शिक्षा योजनेसाठी केंद्र व राज्य शासनाच्या हिस्स्याचे प्रमाण (केंद्र:राज्य) ६०:४० असे आहे. केंद्र शासनाने संदर्भ क्र. २, दि. २२.०३.२०२४ रोजीच्या आदेशान्वये सर्वसाधारण (General) उपयोजनेसाठी चौथ्या हप्त्याचा केंद्र हिस्सा रु.७३,१४,११,०००/- इतका निधी मंजूर केला आहे. वित्त विभागाच्या अर्थोपाय शाखेने केंद्र हिस्सा निधी राज्य शासनाच्या एकत्रित निधीत जमा झाल्याबाबत दि.२६.०३.२०२४ रोजी ई-मेलद्वारे कळविले आहे.

३. केंद्र शासनाने वितरीत केलेला सर्वसाधारण (General) उपयोजनेसाठी “मागणी क्रमांक ई-२, २२०२, सर्वसाधारण शिक्षण, ०१ प्राथमिक शिक्षण, १०६-शिक्षक व इतर सेवा, (००) (००) (०२) समग्र शिक्षा अभियान (सर्वसाधारण) (केंद्र हिस्सा ६० टक्के), (२२०२ आय ६२१)” या लेखाशिर्षाखाली रु.७३,१४,१०,०००/- इतका निधी व “मागणी क्रमांक ई-२, २२०२, सर्वसाधारण शिक्षण, ०१ प्राथमिक शिक्षण, १०६- शिक्षक व इतर सेवा, (००) (००) (०१) समग्र शिक्षा अभियान (सर्वसाधारण) (राज्य हिस्सा ४० टक्के), (२२०२ आय ६१२)” या लेखाशिर्षाखाली राज्य हिस्सा रू.११,८३,९५,२६१/- इतका निधी असे एकूण रू.८४,९८,०५,०००/- निधी वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

केंद्र शासनाने उपरोक्त प्रमाणे उपलब्ध करुन दिलेला निधी खालील विवरणपत्रात दर्शविल्याप्रमाणे राज्य प्रकल्प संचालक, महाराष्ट्र प्राथमिक शिक्षण परिषद, मुंबई यांच्याकडे समग्र शिक्षा कार्यक्रमाच्या अंमलबजावणीसाठी या आदेशान्वये वितरीत करण्यास मान्यता देण्यात येत आहे. सदर विवरणपत्रातील स्तंभ क्र. ४ येथील वितरीत करावयाची तरतूद स्तंभ क्र. २ येथील लेखाशिर्षाकरिता मंजूर असलेल्या तरतूदीतून खर्च करण्यात यावी.

| अ. क्र. | लेखाशिर्ष | सन २०२३-२४ या वर्षातील सुधारीत तरतूद | वितरीत करावयाची तरतूद |
|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ |
| १ | मागणी क्र. ई-२, २२०२ सर्वसाधारण शिक्षण, ०१ प्राथमिक शिक्षण, १०६ शिक्षक व इतर सेवा, (००)(००)(०२) समग्र शिक्षा अभियान (सर्वसाधारण) (२२०२ आय ६२१) ३१ सहायक अनुदाने (वेतनेतर)<br>(केंद्र हिस्सा ६० टक्के) | रु.१२८०.०८० कोटी | रु.७३,१४,१०,०००/- |
| २ | मागणी क्रमांक ई-२, २२०२, सर्वसाधारण शिक्षण, ०१ प्राथमिक शिक्षण, १०६- शिक्षक व इतर सेवा, (००) (००) (०१) समग्र शिक्षा अभियान (सर्वसाधारण), (२२०२ आय ६१२) ३१ सहायक अनुदाने (वेतनेतर)<br>(राज्य हिस्सा ४० टक्के) | रु.६५३.३४२२ कोटी | रु.११,८३,९५,२६१/- |
| | **एकूण वितरीत करावयाचा निधी** | | **रु.८४,९८,०५,२६१/-** |

२. समग्र शिक्षा योजनेअंतर्गत प्रथमत: राज्य शासनाच्या एकत्रित निधीतून खर्च होणाऱ्या बाबीचा निधी व ज्याची प्रतिपूर्ती केंद्रशासनामार्फत करण्यात येते अशा घटकांचा निधी राज्याच्या एकत्रित निधीत प्रथमत: प्राध्यान्याने जमा करण्याची कार्यवाही राज्य प्रकल्प संचालक, समग्र शिक्षा, महाराष्ट्र प्राथमिक शिक्षण परिषद, चर्नी रोड, मुंबई यांनी करावी.

३. समग्र शिक्षा योजनेमधील सर्व खर्च हा Single Nodal Account (SNA) मधून करण्यात यावा.

४. सदर शासन निर्णयान्वये वितरीत केलेला निधी केंद्र शासनाच्या दि. २२.०३.२०२४ रोजीच्या आदेशामध्ये दिलेल्या निर्देशानुसार व सन २०२३-२४ मधील वार्षिक कार्य योजना व अंदाज प्रकल्प मान्यता मंडळाने (PAB) मंजुर केलेल्या समग्र शिक्षा योजनेच्या चालू योजनेच्या आवर्ती बाबींसाठी करावा. खर्चासंबंधीच्या सध्याच्या शासकीय धोरणास अनुसरून मंजुर आराखड्यानुसार याच वर्षात सदर निधी खर्च होईल याची दक्षता घ्यावी.

५. वित्त विभाग, शासन निर्णय/परिपत्रक दि. १२.०४.२०२३, दि..०८.१२.२०२३ व दि.०४.०३.२०२४ मध्ये नमूद केलेल्या सर्व बाबींची पूर्तता होत आहे.

६. सदर खर्च वित्त विभाग, शासन निर्णय/ परिपत्रक दि. १२.०४.२०२३ व दि.०८.१२.२०२३ मधील सूचनानुसार करण्यात यावा. सदर निधी आहरीत करून वितरीत करण्यासाठी अवर सचिव/ कक्ष अधिकारी (लेखा/रोखशाखा), शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, मंत्रालय, यांना "आहरण व संवितरण अधिकारी तर सह / उप सचिव, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, मंत्रालय यांना “नियंत्रक अधिकारी" म्हणून घोषित करण्यात येत आहे. सदरचे अनुदान सशर्त अनुदान असून अटी व शर्ती सदर शासन निर्णयामध्ये नमुद केल्याप्रमाणे आहेत. यापूर्वी वितरीत करण्यात आलेल्या निधीचे उपयोगिता प्रमाणपत्र सादर करण्यात आले आहेत.

७. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२४०३२६१६३३४८५२२१ असा आहे. सदर शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

TUSHAR VASANT MAHAJAN

Digitally signed by TUSHAR VASANT MAHAJAN
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=SCHOOL EDUCATION AND SPORTS DEPARTMENT, 2.5.4.20=19c6c23f510a80926e9b7ee5db235979452f3f9e8918118634069a6cc7a22b9f, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=1A39CEF3C157B9EE6A2ABE5779ACF233682613F7B9C335D6BF4877267695CECA, cn=TUSHAR VASANT MAHAJAN
Date: 2024.03.26 16:43:15 +05'30'

**( तुषार महाजन )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. मा. मंत्री (शालेय शिक्षण), यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
२. प्रधान सचिव, (शालेय शिक्षण व क्रीडा विभाग) यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई.
३. आयुक्त (शिक्षण), महाराष्ट्र राज्य, पुणे.
४. राज्य प्रकल्प संचालक, महाराष्ट्र प्राथमिक शिक्षण परिषद, मुंबई
५. महालेखापाल (लेखा परीक्षा), महाराष्ट्र १/२ मुंबई, नागपूर
६. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र १/२ मुंबई/नागपूर
७. संचालक, लेखा व कोषागारे, महाराष्ट्र राज्य, मुंबई-६३
८. सर्व वरिष्ठ लेखा परीक्षक (शिक्षण विभाग)
९. अधिदान व लेखा कार्यालय, मुंबई
१०. उप सचिव (प्रशासन), शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, मंत्रालय, मुंबई
११.वित्त विभाग, (व्यय-५/अर्थसंकल्प शाखा), मंत्रालय, मुंबई
१२.अवर सचिव/कक्ष अधिकारी, लेखाशाखा, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, मंत्रालय, मुंबई
१३.अवर सचिव(अर्थसंकल्प), शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, मंत्रालय, मुंबई.
१४.निवड नस्ती (एसडी-१).

शासन निर्णय क्रमांक:- समग्र २०२३/प्र.क्र. २६१/एसडी-१, दिनांक २६.०३.२०२४ सोबतचे परिशिष्ट

## परिशिष्ट "अ"

**(रक्कम-रुपये)**

| अ. क्र. | केंद्र शासन आदेश | बाब | आवर्ती | | एकूण |
|---|---|---|---|---|---|
| | | | केंद्र | राज्य | |
| १ | २२.०३.२०२४ | प्राथमिक शिक्षण | रु,४८,४५,४५,००० | रु.११,८३,९५,२६१ | रु.६०,२९,४०,२६१ |
| २ | | माध्यमिक शिक्षण | रु.२०,४५,७१,००० | --- | रु.२०,४५,७१,००० |
| ३ | | शिक्षक शिक्षण | रु.४,२२,९४,००० | --- | रु.४,२२,९४,००० |
| | | **एकूण** | **रु.७३,१४,१०,०००** | **रु.११,८३,९५,२६१** | **रु.८४,९८,०५,२६१** |